**<u>वित्तीय मान्यता-</u>**
**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत**
**(NMSA) मृद आरोग्य पत्रिका (SHC)**
**योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरीता वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मृदस १४१८/प्र.क्र.२२५/१७ अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २७ ऑगस्ट, २०१८

<u>वाचा :-</u>

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य पत्रिका योजनेच्या मार्गदर्शक सुचना
२) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग, क्र. वानियो २०१५/प्र.क्र. ५५ / भाग - १ /१५/२ अे, दि. १८ मे, २०१६
३) शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७
३) केंद्र शासनाचे क्र.१६-२/२०१५ Fert Use दि. २७ जून, २०१८ चे पत्र.
४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र.मृसमृचा/कृआ/मृआप/निवि/४५४/२०१८ दि. ०९ जुलै, २०१८
५) शासन निर्णय क्रमांक : मृदस १४१८/प्र.क्र. २२०/१७-अे, दिनांक २४ ऑगस्ट, २०१८

<u>प्रस्तावना :-</u>

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासून सुरू केलेला आहे. यामध्ये राज्यातील सर्व गावांची टप्प्या टप्प्याने निवड करून राज्यातील सर्व शेतक-यांना जमिन आरोग्य पत्रिकेचे वितरण करण्यात येणार आहे. जमिन आरोग्य पत्रिकेच्या माध्यमातून त्यांच्या जमिनीचा रासायनिक गुणधर्म स्थिती,प्रमुख अन्नद्रव्यांची पातळी व सूक्ष्म मुलद्रव्ये कमतरता स्थितीची माहिती शेतक-यांना देण्यात येत आहे.

केंद्र शासनाने सन २०१८-१९ साठी मंजूर केलेल्या नियतव्ययानुसार संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने दिनांक २७ जून, २०१८ च्या पत्रान्वये मृद आरोग्य पत्रिकासाठी केंद्र हिस्याच्या पहिल्या हप्त्यापोटी रु. १५६०.२१ लाख (सर्वसाधारण प्रगवर्गासाठी) इतकी रक्कम वितरीत केलेली आहे. त्यानुसार सन २०१८-१९ मध्ये मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिस्याच्या पहिल्या हप्त्यापोटी रु. १५६०.२१ लाख रकमेस व या प्रमाणात राज्य हिस्याची ४०% प्रमाणे रु. १०४०.१४ लाख अशा एकूण रु. २६००.३५ लाख इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) मृद आरोग्य पत्रिका योजना सन २०१८-१९ मध्ये राज्यात राबविण्यासाठी, केंद्र शासनाने केंद्र हिस्याच्या पहिल्या हप्त्यापोटी वितरीत केलेल्या रु. १५६०.२१ लाख व राज्य हिस्याची ४०% प्रमाणे रु. १०४०.१४ लाख असा एकूण रु. २६००.३५ लाख इतक्या निधीस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**२.** सदर कार्यक्रमातंर्गत रु. २६००.३५ लाख निधीचे घटकनिहाय भौतिक व आर्थिक लक्ष्य पुढीलप्रमाणे राहील.

**(रक्कम रु. लाखात)**

| अ.क्र. | बाबीचे नाव | भौतीक | आर्थिक | | एकुण |
|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र हिंस्सा ६० % | राज्य हिस्सा ४०% | |
| १ | मृद नमूने विश्लेषण ३००.००.रु)प्रति मृद नमुना | रु.३०० x ८३९०२३ मृद नमुने | १५१०.२४१४ | १००६.८२७६ | २५१७.०६९ |
| २ | विश्लेषकाचे प्रशिक्षण | रु ०.६०.x ८ | २.८८ | १.९२ | ४.८० |
| ३ | शेतकरी प्रशिक्षण | रु०.२४. x ३४ | ४.८९६ | ३.२६४ | ८.१६ |
| ४ | कर्मचारी प्रशिक्षण | रु ०.३६.x ३४ | ७.३४४ | ४.८९६ | १२.२४ |
| ५ | आय सी टी | लमसम | ३.८७९ | २.५८६ | ६.४६५ |
| ६ | कार्यशाळा | १ | ०.४५ | ०.३० | ०.७५ |
| ७ | मिशन मॅनेजमेंन्ट | - | ३०.५१९६ | २०.३४६४ | ५०.८६६ |
| **एकूण** | | | **१५६०.२१** | **१०४०.१४** | **२६००.३५** |

**३.** या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०१८-१९ याकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक: डी- ३</u>**
२४०२, मृद व जलसंधारण
(००) (१०१) मृद सर्वेक्षण व चाचणी
(००) (१६) कृषी उन्नती योजना- मृदा आरोग्य पत्रिका (केंद्र पुरस्कृत योजना)
(केंद्र हिस्सा ६०%) (२४०२ अे ०४१) (सर्वसाधारण) योजनातंर्गत
३३- अर्थसहाय्य.

**<u>मागणी क्रमांक: डी-३</u>**
२४०२, मृद व जलसंधारण
(००) (१०१) मृद सर्वेक्षण व चाचणी
(००) (१७) कृषी उन्नती योजना- मृदा आरोग्य पत्रिका (केंद्र पुरस्कृत योजना)
(राज्य हिस्सा ४०%) (२४०२ अे०५९) (सर्वसाधारण) योजनातंर्गत
३३- अर्थसहाय्य.

**४. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.**

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा. त्याप्रमाणे अनुसूचित जाती / जमाती / महिला लाभार्थ्यासाठी खर्चाचे लेखे वरील प्रमाणे ठेवण्याची जबाबदारी अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेची राहील.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबीवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा. तसेच सदरचा अहवाल राज्य शासनाकडेसुध्दा पाठविण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे, जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

५) केंद्र शासनाने वितरीत केल्याप्रमाणे सर्वसाधारण प्रवर्गाच्या लाभार्थी शेतकऱ्यांसाठी निधी खर्च करण्यात येईल याबाबत दक्षता घेण्यात यावी.

६) मृद आरोग्य पत्रिका वितरीत केलेल्या शेतकरी लाभार्थ्याची यादी ग्रामपंचायत / तालुका कार्यालये/ पंचायत समिती /जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी. तसेच, यादी कृषि विभागाच्या संकेतस्थळावर देखील अपलोड करण्यात यावी.

७) कोणत्याही परिस्थितीत मंजुर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही, या बाबत कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ) कृषि आयुक्तालय, पुणे यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी.

**५.** कृषि आयुक्तालय स्तरावर कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य-पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन तसेच, सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. तसेच, जिल्हा स्तरावर सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी हे नियंत्रक अधिकारी आणि जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिका-यांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी PFMS पध्दतीने अनुदानाची जिल्हानिहाय वितरणाची कार्यपध्दती राबविणे बंधनकारक राहील.

**६.** प्रस्तुतचे आदेश वित्त विभागाचे परिपत्रक दिनांक १८ एप्रिल, २०१७ रोजीच्या अन्वये दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२७११३६११५२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2018.08.27 11:41:14 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री ( कृषी )/ मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव (कृषी ) यांचे स्वीय सहाय्यक (कृषि व पदुम विभाग) मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त ( कृषी), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
५) कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे
६) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१२) नियोजन विभाग-१४३१, मंत्रालय, मुंबई
१३) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवडनस्ती.